नवनाथ भक्तिसार अध्याय सहावा

बारा मल्हार नामक विस्तीर्ण अरण्यमय प्रदेशातून मार्गक्रमण करीत असताना मच्छिंद्रनाथ रात्रभर वस्तीसाठी म्हणून थांबले असताना योगायोगाने त्यांना पिशाच्च योनीशी घनघोर संग्राम करावा लागला. भूतराजा आग्यावेताळ आणि त्याच्या आठ कोटी सेनेच्या पाडाव करून त्यांना अभय देताना मच्छिंद्रनाथांनी त्यांच्याकडून कबुली करवून घेतली की 'ज्या घरात हे आख्यान संग्रही असेल तेथे भुतांनी वावरू नये. त्या घरांवर कांही विघ्न आल्यास सर्व भूतांनी मिळून निवारण करावे.' स्वतःसाठी काही अपेक्षा ना करता, जनकल्याणासाठी ही निःस्वार्थी आणि विनम्र मागणी ऐकून भुते आणि भूतनाथ आग्यावेताळही प्रभावित झाले. विनम्र झाले.

बारा मल्हारांचे दर्शन करून पुढे कूच करीत असताना मच्छिंद्रनाथांनी कुमार दैवताच्या (कार्तिकेय) दर्शनाची संधी मिळाली. भ्रमंती करीत नाथ कोकणातील कुडाळ येथे आले. तेथे आडूळ नामक एक गाव आहे. गावाबाहेरील महाकालीच्या पुरातन मंदिरात दर्शनासाठी गेले. महाकाली देवीचे हे स्थान प्रसिध्द असून साक्षात महादेवानेच तिची स्थापना केली आहे. महादेवाच्या हातातील महापराक्रमी, उग्र रूपातील कालिका अस्त्र तिथे विश्रांती घेत आहे. कोकणातील अनेकांचे ते कुलदैवत असून या देवतला कालकाई, कालीका आई या नावाने संबोधतात. या देवतेची कहाणी म्हणजे महादेवीने कालिकेच्या रूपाने शिवाच्या हातात विराजमान होऊन शास्त्राप्रमाणे कार्य केले. अथक परिश्रमाने असुरांचे निर्दालन केले. तेव्हा शंभू महादेव प्रसन्न होऊन तिला म्हणाले, "तू वर माग, मी तुझ्या अपेक्षेची पूर्तता करीन." तेव्हा कालिका म्हणाली, "अपर्णापती महादेवा! अनेक दिवस शस्त्ररुपाने तुमच्या हातात विराजमान होऊन तुम्ही सांगाल ते काम मी यशस्वीपणे पार पाडले आहे. अनेक बलाढय दानवांचे पारिपत्य केले आहे. अंबिकाच्या आज्ञे प्रमाणेसुद्धा मी अनेक दैत्यांचा संहार केला आहे. त्या अविश्रांत श्रमाने मी थकले असून शांतपणे आराम करण्याची माझी इच्छा आहे" त्याक्षणी महादेवांनी होकार दिला आणि तिला विश्रांती मिळावी म्हणून तिची त्या ठिकाणी स्थापना केली.

त्या कालीकामातेच्या दर्शनाच्या ओढीने व्याकूळ होऊन मच्छिंद्रनाथ आले होते. मंदिरात जाऊन उग्रेश्वरीची मनोभावे पूजा केली आणि हात जोडून म्हणाले, "आदिमाया शक्तीमाते कालीकाई!! तू जागी होऊन मला बालकाला आशीर्वाद दे. मी मानवजातीच्या कल्याणास्तव शाबरी मंत्र काव्य केले आहे. तू प्रसन्न होऊन त्यास सहाय्यभूत हो. माझ्या हातांत शक्ती स्वरूपात विराजमान होऊन मानव कल्याण कार्यासाठी सहाय्य करण्याचे वरदान देऊन माझ्यावर कृपा कर!"

तिथल्या निरव शांततेत अतिश्रमाने थकून विश्रांती घेत असलेल्या कालीकामातेची निद्रा ह्या प्रार्थनेने भंग पावली. उग्रेश्वरीच ती! आपल्या झोपेत व्यत्यय आल्याने ती संतापली. कालयवनाने निद्राभंग केल्यामुळे जसा मुचकुंद कोपला, भक्त प्रल्हादावरील अत्याचार पाहून जसा श्री विष्णु क्रोधीत होऊन खांबातून नरसिंह रूपाने प्रकटला. त्याच प्रमाणे शांतीमध्ये, निद्रेमध्ये, व्यत्यय आल्याने कालिकामाता कडाडली. "अरे नष्टा, अनिष्टा, पतिता!! दुरात्मा! मी शांतपणे विश्रांती घेत असताना मला त्रास देण्यासाठी का आलास? अरे दुरात्मा! मंत्रकाव्य तू केलेस आणि माझे वरदान मागतोस? मला नाहक श्रम देण्याचे तुझे प्रयत्न चालले आहेत. मला कष्ट दिलेस तर वरदानाऐवजी माझ्या शापाला कारणीभूत होशील. चल दूर हो माझ्या डोळयांसमोरून नाहीतर शिक्षा करीन. मी तुझ्या हातात विराजमान होईन असा विचार तरी कसा आला? तू स्वतःला महादेवाच्या बरोबरी चा समजतोस काय? श्रीमंती सोडून कुणी नरोटी घेऊन भीक

मागेल काय? हिरकणीला पितळेचे कोंदण शोभेल काय? राजहंस कधी कावळ्याची चाकरी करेल काय? सागर कधी छोट्या डबक्यात समाविष्ट होईल काय? मिणमिणती दिवटी सुर्यतेजापेक्षा प्रेक्षणीय होईल काय? चील्ताने गरुडाची बरोबरी करावी काय? तुझ्यासारखा भिक्षेकऱ्याने राजपंक्तीची स्वप्ने पहावीत काय? मोठा पांडित्याचा आव आणतोस? मुर्खा!! तुझ्या हातात विराजमान होण्यास मला सांगतोस? लाज नाही वाटत? तुझे अभद्र मुख घेऊन तात्काळ निघ. नाहीतर दिपज्योतीवर झेप घेतल्यावर पतंग जळतो तसे भस्म करून टाकीन!!"

कालीकामातेचा काही तरी गैरसमज झाला होता. गैरसमजामुळे संघर्ष निर्माण होईल याची नांदी तर झालीच. कालीकामातेची कडवट आणि उपमर्दकारक भाषा खरं तर दुखवणारी होती पण नाथ परमेश्वारच्या आग्रहास्तव भूलोकात अवतार घेणारा आद्य नारायण! देवत्वाचा अंश त्याच्या देहात आणि वृतीत होताच. मच्छिंद्रनाथ म्हणाले, "देवी माते! दिपज्योतीवर जळणारा पतंग दुर्बल असतो. तथापि मी तसा नाही, माझा प्रताप तुला माहीत नाही सूर्यबिंब लहान दिसले तरी त्याच्या प्रकाश विश्वव्यापी असतो. त्याप्रमाणे माझे प्रताप दाखवून तुला प्रसन्न करून घेईन. श्वेतद्वीपात पांडवांनी हनुमंताला जिंकून राज्याच्या ध्वजावर विराजमान केले. सूर्याने अरुणाला सारथी केले. त्याप्रमाणेच मी तुझे वरदान प्राप्त करीन तरच दत्तात्रेयाचा शिष्य म्हणून जगात मिरवेन.

कालीकामाता पुनश्च कडाडली. "अरे मूढा! भ्रष्टा!! कान फाडून आला आहेस आणि मला भय दाखवतोयेस? हातात कंकणे घालून, भाळावर शेंदूर फासून सोंग घेऊन आलास म्हणून मी तुला घाबरेन काय? तुझी उत्पत्ती मला माहित आहे कोळ्याच्या उदरी जन्म घेतलेला कार्टा तू! जा; मासे पकडून तुझी उपजीविका चालव, तू जर एवढा ज्ञानी पंडित, अस्त्रविद्यानिपुण आहेस तर, दारिद्र्यासारखा का भटकतो आहेस? अधांचे डोळे जसे शोभेचे, बहुरूप्याचे शोर्य जसे लूटपूटीच्या खेळापुरते असते, तसे तुझे पांडित्य आणि कवित्व! अरे दांभीका; महाराथीचा आव आणून मला शौर्य दाखवण्यापूर्वी विचार तरी केला आहेस का? भूततावळयांना (पिशाच्चयोनी) जिंकलेस म्हणून तुला गर्व झाला आहे. मी शिवास्त्र कालिका आहे. नुसती भ्रूकूटी वक्र केला तरी ब्रह्मांडाची उतरंड ढासळून जाईल. तेथे तुझी मशकाची काय कथा? तुझ्यासारख्या मशकाच्या धडकेने ब्रह्मांडाचे काय अनिष्ट होईल? घुंगुरद्या! मला आव्हान देतोस?? यावर नाथ म्हणतात,

"देवते! बळीराजाने असाच दानशूरपणाचा गर्व करून बटू वामनाला मशक मानले होते. तथापि केवळ तीन पावलात बटूने त्याला पाताळ लोकी धाडला याचे स्मरण आहे ना?" हे ऐकताच अत्यंत क्रोधाने कालिका धावून आली आणि म्हणाली, "तुझ्याकडे वामनासारखे काय सामर्थ्य आहे ते दाखवच मला आता, आज मीच तुझी परीक्षा घेणार आहे, फार उंच वाढलेला वृक्ष वादळात मुळांसकट उन्मळून पडतो तसाच तुझा गर्व मी उन्मळून टाकीन. अनेक राक्षसी युद्धात सातत्याने तुझा विजय झाला, परिणामी तुला उभेध अशा पहाडासारखा गर्व झाला असून आज तुझ्याच प्रारब्धयोगे त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतील." अशी परिस्थिती निर्माण झाली की स्वतःविषयी विलक्षण आत्मविश्वास आणि भगवंतावर श्रद्धा असल्यामुळे मच्छिंद्रनाथ प्रश्नाला उत्तर देत होते. त्यामुळे तणाव निर्माण झाला. भद्रकालीने क्रुद्ध होऊन विक्राळ रूप धारण केले. सिंहिणीसारखी डरकाळी ठोकली. सहस्त्र सूर्यांच्या तेजासारखा क्षणभर लाखलखाट झाला आणि कालिकामाता ब्रह्मांड उजळीत गगनात उडाली. सहस्र विजांचा कडकडाट ध्वनी आसमंतात प्रतिध्वनीने झाला, चराचराचा थरकाप उडाला. विश्वाचा प्रलय काळ होणार असे वाटले, त्या भीषण कडकडाटाने पर्वत कडेकपारी ढासळू लागले, वनचर जलचर, दानव, मानव, अष्ट दिग्गज, अष्ट दिक्पाल सर्व जीवित भयाने ठायी ठायी दडून बसले.

महासागर, सप्तपाताळ हेलावले. धरणी दुभंगून रसातळाला जाईल असा भास झाला. स्वर्गातील देवही भयभीत झाले. कालिका कडाडली, "सावधान जोगड्या!! जीव वाचव स्वतःचा, मी आता आक्रमण करीत आहे विनाकारण मला डीवचलेस आता तुझ्या चुर्णाने धरणीवर रांगोळी घालीन. वाज्राघाताने जसे पाषाणाचे चूर्ण होते, तसे तुझे करीन. धरणी म्हणजे जात्याच्या खालची तळी आणि मी वरची तळी होऊन मच्छिंद्ररुपी धान्याचे दळून पीठ करीन. जोगड्या! आता तुझ्या गुरुचे स्मरण कर. सावध हो! हा बघ हल्ला आला..."

मच्छिंद्रनाथांनीही प्रतिउत्तर केले, "व्यर्थ वल्गना करू नकोस विंचवाची नांगी ठेचावी तशी मी तुला ठेचून काढतो. चल ये! आता विलंब करू नकोस...!" असे म्हणून काखेतील भस्म झोळीत हात घालून चिमुटभर भस्मावर वासवास्त्र जपून गगनातील कलिकेवर फेकले. हजारो सर्य एकाच वेळी प्रकाशावेत तसा तेजस्वी गोलाकार आकाशाकडे झेपावला. वासवास्त्र शक्ती कलिकेवर धावून गेली. सूर्याकडून नाथांना मिळालेली वासवशक्ती आणि शिवाची कालिका शक्ती एकमेकांना भिडून रणतुंबळ युद्ध संग्राम सुरु झाले. सूर्य चंद्र, हरी हर, शुक्र बृहस्पती, मेरू मंदार, वायू मारुती याप्रमाणे त्या तुल्यबळ शक्तींचे वाली सुग्रीव, भीम जरासंध यांच्या सारखे द्वंद सुरु झाले. ब्रह्मांड स्फोट झाल्याप्रमाणे प्रहारांचे आवाज येऊ लागले. रौद्र आरोळी ठोकून रौद्रेश्वरी कालिकामातेने वासवशक्ती स्वाहा केली. वासाव्स्त्राचा पाडाव झाला त्यामुळे कालिका अतिक्रूर होऊन किंकाळी ठोकून चाल करून आली असता मच्छिंद्रनाथाने एकादश रुद्रमंत्र प्रयोग जपून अकरा रुद्र प्रकट केले. तथापि कालिकेने त्याची स्तुती, पूजा आणि नमन करून त्यांना शांत केले. ते लुप्त झाल्याचे पाहताच नाथांनी वज्रास्त्र फेकले आणि त्याच्या जोडीला सहाय्य करण्यासाठी धुम्रास्त्र फेकले. त्यातून प्रसारित झालेल्या धुरामुळे आकाश झोकाळून गेले. सूर्य चंद्र, तारे अदृश्य झाले. त्या अंधारात वज्राने आघात करण्याचा प्रयत्न केला. पण कालीकाने वज्राला लत्ताप्रहाराने खाली पाडले. वज्रास्त्र विलक्षण वेगात शैलाद्री पर्वतावर आपटल्याने अर्धा पर्वत निखळून चक्काचूर झाला. त्या महाकाय पर्वताची उंची अर्ध्यावर आली. आजही त्याची साक्ष पटते. रामेश्वरापासून गुजरात राज्यापर्यंत उंचच उंच पर्वतरांगा आहेत. सहयाद्री पर्वत त्याच रांगेत आहे परंतु गुजरात नंतर पुढे उंच पर्वत उरला नाही. देवीने धुम्रास्त्र सुद्धा गिळून नष्ट केले. हे पाहून मच्छिंद्रनाथांनी वाताकर्षण अस्त्र सोडले. शुक्राचार्याला संजीवनी, वशिष्टांना कामधेनु, श्रीविष्णूंना सुदर्शन, यमाचे यमन, दमाचे दमन त्याचप्रमाणे मच्छिंद्रनाथांना वाताकर्षण नामक मंत्ररूपी रत्न लाभले होते त्या अस्त्राने मात्र बाजी उलटली उग्रेश्वरी मातेचा श्वास कोंडला गेला. तिच्या सभोवतीचा वात आकर्षिला गेल्यामुळे निर्वात पोकळी निर्माण होऊन श्वासोच्छवासाठी वायू दुर्मिळ झाला. मूर्च्छित होऊन देवता धरणीवर कोसळली तिच्या आदळण्याने पर्वत, महावृक्ष, पशुपक्षी चिरडले गेले. देव दानवही भयचकित झाले. डोळे पांढरे करून बेशुद्धीतही कोसळतांना तिने धावा केला. "धावा उमानाथा! धावा कैलासनाथ!! धावा महादेवा! माझ्या प्राणाचे रक्षण करा."

कलिकेची आर्त स्वरातील विनवणी श्री शिवाच्या कानापर्यंत पोहोचली. कालिका संकटात आहे याची जाणीव झाली. ते सतर्क झाले. अंतःचक्षुंनी पहिले असता हे कृत्य मच्छिंद्राचे असल्याचे त्यांनी ओळखले आणि त्याक्षणी ते प्रकटले. प्रत्यक्ष महादेव समोर दिसताच मच्छिंद्रनाथांनी त्यांच्या चरणावर लोटांगण घातले. महादेवानी त्याला प्रेमाने ह्रदयाशी धरले आणि म्हणाले, "वत्सा, केवढा मोठा पराक्रम तुझ्या कडून झाला आहे! रौद्रेश्वरी कालीकेला रंणागणात हरविणे कोणाला ही शक्य नव्हते, तथापि तू झुंजारपणाची शर्थ केलीस."

मच्छिंद्रनाथ नम्रतेने वंदन करीत म्हणाले, "आदिनाथ! ही आपलीच कृपा आहे. बद्रिकाश्रमात गुरुदेव दत्ताकरवी विद्यादान करून आपण स्वतः सहा महिन्यापर्यंत माझे रक्षण केले होते महाराज!!" "असो ! आता वेळ न घालविता कालीकेला सावध कर." श्री शंभू म्हणाले. "आदिनाथा!! आपण प्रथम माझ्या मस्तकावर वरद हस्त ठेवा कारण माझी तुमच्या कडेही किंचित अशी मागणी आहे. तिची पूर्तता व्हावी ही विनंती आहे.

"बोल तू ! तुझी इच्छा पूर्ण करीन."

"कैलासनाथ!! आपल्याच आशीर्वादाने आणि प्रेरणेने मी जगतकल्याणार्थ शाबरीमंत्र काव्यरचना केली आहे, त्यांस कालीकामातेने सहाय्य करावे. तुमच्या हाती राहून कालीकेने अचाट पराक्रम केले असून, आता तिने माझ्या जिव्हेवर विराजमान व्हावे. 'मंत्रोच्चार होताच कालिका त्याप्रमाणे कार्य सिद्ध करील' असे मला वरदान द्यावे." अशी कळकळीची मागणी नाथांनी शंकरापुढे केली.

"तथास्तु ! कालिका अवश्य तुझ्या स्वाधीन करीन, तिच्याबरोबर मी स्वतः प्रसन्न होऊन सहाय्य करीन पण त्यापूर्वी मरणप्राय अवस्थेत असलेल्या त्या देवतेला जीवनदान दे." असे श्री शंकरांनी सांगताच, मच्छिंद्रनाथांनी वातप्रेरक अस्त्र सोडून आकर्षण प्रभाव नाहीसा केला. वायूची पूर्तता होताच कालिकामाता शुद्धीवर येऊन उठून बसली, आजूबाजूस न्याहाळत असताना महादेव दृष्टीस पडले. तिने शुद्धीवर येताच शंभू महादेवाच्या पायांवर लोटांगण घातले आणि जीव वाचवल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. कालीका म्हणली, "आदिनाथ!! आज आपणच माझे प्राणरक्षण केले आपण भस्मासुराला वर देऊन स्वतःच संकटग्रस्त झाला असताना विष्णूने मोहिनीरुपाने आपले रक्षण केले. लक्ष्मण शक्तीघाताने धरणी पडला असताना हनुमंताच्या मदतीने रामाने त्याचे रक्षण केले त्याप्रमाणे धावून आपण माझे प्राणरक्षण केले आहे" त्यावर शिवभगवान म्हणाले, "कालिका! माझे एक मागणे आहे. ते जर तू पूर्ण केलेस तर मी तुला नागरत्न देईन."

"आपण आज्ञा करावी स्वामी"

"एक अमोघ शस्त्रशक्ती म्हणून इतकी वर्षे तू माझ्या हातात राहिलीस तशीच आता जगत् काळ्याणास्तव मच्छिंद्रनाथास सहाय्य कर, एवढेच दान देण्याची कृपा कर!" असे शिव शंकर उत्तरले. आदिमायेने निर्मळ हास्य केले आणि म्हणाली, "स्वामी! मी तर तुमची दासी आहे, दान कसले मागता? आज्ञा करा. जिकडे म्हणाल तिकडे मी जाईन. देवगुरु बृहस्पती विद्येसाठी निरक्षर गुराख्याला, उड्डाणकला शिकविण्यासाठी मारुतीने मर्कटाला, मृत्यु निवारण्यासाठी अमृताने द्रव खाद्यान्याला एका पैशासाठी परिसाने धनाड्याला याचना करावी, तशी विपरीत मागणी आपण माझ्याकडे करून मला मोठेपणा देऊन लज्जित करीत आहात. आपण माझे स्वामी आणि मी आपली चरणदासी आहे. स्वामींचा शब्द आज्ञा प्रमाण म्हणून मला सदैव मान्य आहे." असे म्हणून कालिका मातेने मच्छिंद्रनाथांना हृदयाशी कवटाळले आणि म्हणाली, "पुत्रा! तुझ्या शाबरी मंत्रात जिथे माझे नाव येईल, तिथे मी त्याच्या अर्थाप्रमाणे कार्य करीन हे माझे वचन आहे."

कालीकामातेने मच्छिंद्रनाथ आणि श्री शंकर या उभयतांना तीन दिवस पाहुणचार करून सन्मानाने निरोप दिला. त्यानंतर नाथ आडूळ गावातून कोकण किनारपट्टीने उत्तरेकडे हरेश्वराकडे निघाले. इत्यलम.

हा अध्याय नित्य पठण करील त्या भाविकाला मुठ्बाधा, कुडचेडे चेटूक, काळीमुळ (काळी विद्या) अशा भयकारी जारणमारण विनाशकारी विद्यांचा उपसर्ग कधी होणार नाही. कालिकामाता सदैव रक्षण करील आणि भयमुक्ती होईल. असे गोरक्ष किमयागार या ग्रंथात सांगितले आहे. हे आख्यान घरात ठेवून पूजा केली तरी बाधा होणार नाही. ही सिद्धीची वाणी, अमृत संजीवनी आहे.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने शत्रू मोहित होऊन आपला दास होईल.